राष्ट्रीय वनीकरण कार्यक्रम (केंद्र पुरस्कृत योजना) अंतर्गत सन २०१४-१५ करिता रु.३५००.०० लक्ष रक्कमेचा चालू बाब प्रस्ताव.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एफडीएम-२०१४/प्र.क्र.११४(भाग-३)/फ-२**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,**
**तारीख: २९ जानेवारी, २०१५**

**वाचा —**

१) पर्यावरण व वन मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र.एफ.क्र.२५.१.१/९९ BII, दि.२६.०५.२०१४
२) पर्यावरण व वन मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र.F.No.MEF(NAEB)२-१/२०१४-B-III, दि.२६.०६.२०१४
३) पर्यावरण व वन मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र .F.No.MEF(NAEB)२-१/२०१४-B-III, दि.२६.०६.२०१४
४) पर्यावरण व वन मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र.F.No.MEF(NAEB)२-१/२०१४-B-III,दि.१०.०७.२०१४
५) पर्यावरण व वन मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र.F.No.MEF(NAEB)२-१/२०१४-B-III, दि.१०.०७.२०१४
६) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) , महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-१/सी/मराववियं/प्र.क्र.०१/कृआ/१३१३, दि. १४.११.२०१४.
७) पर्यावरण व वन मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. F.No.MEF&CC(NAEB) :२-१/२०१४-B-III ,दि.०१.१२.२०१४
८) पर्यावरण व वन मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. F.No.MEF&CC(NAEB) :२-१/२०१४-B-III ,दि. ०१.१२.२०१४
९) वित्त विभाग, परिपत्रक क्र पूरक-२०१४/प्र.क्र.५८९/अर्थसंकल्प-३, दि.०१.०१.२०१५
१०) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.एफडीएम-२०१४/प्र.क्र.११४/फ-२, दि.०६.०१.२०१५.

**प्रस्तावना —**

राष्ट्रीय वनीकरण कार्यक्रम योजनेअंतर्गत महाराष्ट्र राज्य वनविकास यंत्रणे मार्फत राबविण्यात येणा-या केंद्रपुरस्कृत योजनेअंतर्गत सन २०१४-१५ करिता सर्वसाधारण घटक (२४०६ ८४८२) याकरिता रु.३१४७.६१ लक्ष व अनुसूचित जाती उप योजना (२४०६ ८४९१) याकरिता रु.३५२.४० लक्ष याप्रमाणे एकूण रु.३५००.०० लक्ष इतका नियतव्यय केंद्रशासनाकडून संदर्भ क्र.२ व ३ वरील

दि.१०.०७.२०१४ रोजीच्या २ पत्रान्वये मंजूर करण्यात आलेला आहे. सदर मंजूर नियतव्ययापैकी सर्वसाधारण घटकाकरिता रु.१५७३.८० लक्ष व अनुसूचित जाती उप योजनेकरिता रु.१७६.२० लक्ष याप्रमाणे एकूण रु.१७५०.०० लक्ष इतका निधी प्रथम हफ्त्यापोटी मुक्त केलेला आहे. तर, केंद्र शासनाने संदर्भ क्र.७ व ८ वरील दि.०१.१२.२०१४ च्या दोन पत्रान्वये सर्वसाधारण घटक व अनुसूचित जाती उप योजनेकरिता अनुक्रमे उर्वरित रु.१५७३.८० लक्ष व रु.१७६.२० लक्ष असा एकूण रु.१७५०.०० लक्ष निधी दुसरा हफ्ता म्हणून मुक्त केलेला आहे. अशाप्रकारे केंद्र शासनाने सर्वसाधारण घटकांकरिता रु.३१४७.६० लक्ष व अनुसूचित जाती उप योजनेकरिता रु.३५२.४० लक्ष याप्रमाणे एकूण रु.३५००.०० लक्ष इतका निधी मुक्त केलेला आहे.

२. उपरोक्त योजना ही सन २०१४-१५ पासून राज्याच्या वार्षिक योजनेमधून राबवावयाची आहे. सदर योजनेकरिता संदर्भ क्र.१० वरील दि.०६.०१.२०१५ च्या शासन निर्णयान्वये २ नवीन लेखाशीर्ष निर्माण करण्यात आलेले आहेत. परंतू सदर लेखाशीर्षाखाली योजनेकरिता मंजूर असलेला निधी अर्थसंकल्पित करण्यात आलेला नसल्यामुळे सदर दोनही योजना राज्याच्या योजनेमध्ये समाविष्ट करुन त्यामध्ये निधी अर्थसंकल्पित करण्याकरिता सन २०१४ च्या हिवाळी अधिवेशनामध्ये २४०६ ८४८२ व २४०६ ८४९१ या संकेतांकाअंतर्गत सादर केलेल्या अनुक्रमे रु.३१४७.६१ लक्ष व रु.३५२.३९ लक्ष याप्रमाणे एकूण रु.३५००.०० लक्ष रक्कमेच्या पुरक मागणीच्या प्रस्तावांना विधानमंडळाची मान्यता मिळालेली असून, त्यासंदर्भात वित्त विभागाने संदर्भ क्र.९ वरील दि.०१.०१.२०१५ रोजी परिपत्रक निर्गमित केलेले आहे.

३. त्याअनुषंगाने, सदरहू रु.३५००.०० लक्ष इतका निधी वितरीत करण्याकरिताचा प्रस्ताव अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र.६ येथील दि.१४.११.२०१४ रोजीच्या पत्रान्वये शासनास मान्यतेसाठी सादर केलेला असून सदरचा निधी वितरीत करावयाची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय—**

४. उपरोक्त वस्तुस्थितीचा विचार करता, केंद्र शासनाने संदर्भ क्र.२ व ३ वरील दि.१०.०७.२०१४ रोजीची दोन पत्रे आणि संदर्भ क्र.७ व ८ वरील दि.०१.१२.२०१४ रोजीची दोन पत्रे याअन्वये प्रथम व दुस-या हफ्त्यापोटी मंजूर व वितरीत केलेल्या एकूण रु.३५००.०० लक्ष इतक्या निधीमधून सदर दोन योजनांकरिता खालीलप्रमाणे उद्दिष्टनिहाय रु.३५००.०० लक्ष इतका निधी महाराष्ट्र राज्य वनविकास

यंत्रणा तथा अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांना या शासन निर्णयान्वये वितरित करण्यात येत आहे.

| अ.क्र | लेखाशीर्षष / संकेतांक | ०२२२ मजूरी | २१ पुरवठा व सामग्री | ५० इतर खर्च | एकूण |
|---|---|---|---|---|---|
| १ | राष्ट्रीय वनीकरण कार्यक्रम **(सर्वसाधारण) २४०६८४८२)** | २३०८.०० | ५७७.६० | २६२.०० | **३१४७.६०** |
| २ | राष्ट्रीय वनीकरण कार्यक्रम **(अनुसूचित जाती उपयोजना) २४०६)** ८४९१) | २५७.३० | ६४.३२ | ३०.७८ | **३५२.४०** |
| | **एकूण** | **२५६५.३०** | **६४१.९२** | **२९२.७८** | **३५००.००** |

५. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सदर निधी या विभागाकडून मंजूर केलेल्या प्रस्तावातील क्षेत्र / कार्यक्रम / कामे यावरच खर्च होईल व कामाची द्विरुक्ती होणार नाही आण मंजूर कामांव्यतिरिक्त कोणत्याही नवीन बाबीवर /नवीन क्षेत्रावर/ नवीन कामांवर खर्च करण्यात येणार नाही याची दक्षता घ्यावी. तसेच सदरहू निधी वितरित करण्यापूर्वी प्रस्तावानुसार योजनेतील निश्चित केलेल्या कामांना सक्षम अधिका-यांची तांत्रिक व प्रशासकीय मंजूरी असल्याची व त्याचबरोबर सध्या वाटप करण्यात येणा-या अनुदानातून खर्च करताना यामध्ये कोणतीही वित्तिय अनियमितता होणार नाही याची दक्षता घ्यावी. त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या दि.०१.०७.२०१४ रोजीच्या शासन परिपत्रकातील अटी व शर्तींची पूर्तता करण्यात येईल याची देखिल दक्षता घ्यावी.

६. सदर योजनेवर होणारा खर्च मागणी क्र.सी-७, प्रधान शीर्ष - २४०६ वनीकरण व वन्यजीवन, ०१, वनीकरण, १०२ सामाजिक व क्षेत्रीय वनीकरण, केंद्र पुरस्कृत योजना, (१२) राष्ट्रीय वनीकरण कार्यक्रम, (११) सामाजिक व क्षेत्रीय वनीकरण, केंद्रीय पुरस्कृत योजना, **(११) (१९)** राष्ट्रीय वनीकरण कार्यक्रम (१०० % केंद्र पुरस्कृत योजना) **(सर्वसाधारण) (२४०६ ८४८२)** आणि (११) **(२०)** राष्ट्रीय वनीकरण कार्यक्रम (१०० % केंद्र पुरस्कृत योजना) **(अनुसूचित जाती उपयोजना) (२४०६ ८४९१)** या दोन लेखा शिर्षाअंतर्गत सन २०१४-१५ मध्ये मंजुर होणा-या अनुदानातुन भागविण्यात येईल.

७. सदर शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय विभाग, नियोजन विभाग व वित्त विभागाच्या सहमतीने आणि वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.३९/२०१५/व्यय-१०, दि.२८.०१.२०१५ अन्वये प्राप्त सहमतीनुसार तसेच वित्त विभागाचा शासन निर्णय क्र.विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/ २००८/विनियम, दि.१५.०५.२००९ भाग पहिला उपविभाग-३ परिच्छेद २७ (२) अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०१२९१५४९१७६०१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

Dattatraye Laxman Thorat

Digitally signed by Dattatraye Laxman Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Dattatraye Laxman Thorat
Date: 2015.01.29 16:01:05 +05'30'

( द.ल.थोरात )
सह सचिव
महसूल व वन विभाग

**प्रति :-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) मुख्य वनसंरक्षक (प्रा.), सर्व
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), १/२ महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
५) सह सचिव /उप सचिव (अर्थ-६) /व्यय-१०/अर्थोपाय, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
६) सह सचिव (विशेष घटक योजना), सामाजिक न्याय व विशेष सहाय विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
७) उप सचिव (कार्यासन १४७५), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
८) जिल्हा कोषागार अधिकारी सर्व
९) ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.
१०) निवडनस्ती, फ-२ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.